**राष्ट्रीय आयुष अभियान**
**राज्य आयुष सोसायटीच्या कार्यकारी समितीच्या (Executive Body) सदस्य सचिव पदावर आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची नियुक्ती करणेबाबत तसेच राष्ट्रीय आयुष अभियान राज्य प्रकल्प सनियंत्रण कक्ष (State Project Monitoring Unit) आरोग्य सेवा आयुक्तालयाकडे वर्ग करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सा.आ.वि.-३००११/प्र.क्र.४८३/२०१४/आरोग्य -७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०५ ऑक्टोंबर, २०२०.

वाचा :-

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. सा.आ.वि.-३००११/प्र.क्र.४८३/२०१४/ आरोग्य -७, दिनांक २२.०६.२०१६.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त दिनांक २२.०६.२०२० च्या शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आयुष अभियान योजनेची अंमलबजावणी राज्यामध्ये सुरु करण्यास व त्यासाठी राज्य आयुष सोसायटी स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. राज्य आयुष सोसायटी मध्ये मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील नियामक मंडळ (Governing Body) व प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समिती (Executive Committee) यांचा समावेश आहे. तसेच, आयुष अभियानाच्या अंमलबजावणी साठी राज्य स्तरावर राज्य कार्यक्रम व्यवस्थापन कक्ष (State Programme Management Unit-SPMU) स्थापन करण्यात आला आहे.

राज्य आरोग्य सोसायटीच्या कार्यकारी समितीचे सदस्य सचिव म्हणून संचालक, आयुष, महाराष्ट्र राज्य यांची नियुक्ती करण्यात आली आहे.तसेच त्यांच्यामार्फतच राज्य प्रकल्प सनियंत्रण कक्षाचे कामकाज हाताळले जाते.तथापि ,संचालक,आयुष हे वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख असल्याने राष्ट्रीय आयुष अभियानाच्या अंमलबजावणीत एकसूत्रीपणा आणून अभियान प्रभावीपणे राबविण्याच्या दृष्टीने या प्रशासकीय व्यवस्थेत किंचित बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता व त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियानाचे बहुताशी कामकाज हे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आयुक्त तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, आरोग्यसेवा आयुक्तालय यांचे मार्फत केले जाते. आयुक्त, आरोग्य सेवा या पदावर भारतीय प्रशासन सेवेतील अधिकालिक वेतनश्रेणीमधील वरीष्ठ अधिकारी कार्यरत असतात. आयुक्त, आरोग्य सेवा हे अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान म्हणूनसुद्धा पदसिद्ध आहेत. त्यामुळे राष्ट्रीय आयुष अभियानाच्या अंमलबजावणीत एकसूत्रीपणा आणून अभियान प्रभावीपणे राबविण्याच्या दृष्टीने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत:-

१. राज्य आयुष सोसायटीच्या कार्यकारी समितीचे सदस्य-सचिव म्हणून संचालक, आयुष संचलनालय, मुंबई यांचे **ऐवजी** आयुक्त,आरोग्यसेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची नियुक्ती करण्यात येत आहे. तेवढ्यापुरता दिनांक २२.०६.२०१६ चा शासन निर्णय सुधारित झाल्याचे समजण्यात यावे.

२. राष्ट्रीय आयुष अभियानाचा राज्य प्रकल्प सनियंत्रण कक्ष (State Project Monitoring Unit-SPMU) हा संचालक, आयुष संचालनालय, मुंबई यांचेकडून आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचेकडे वर्ग करण्यात येत आहे.

०२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई व संचालक, आयुष संचालनालय, मुंबई यांनी या अनुषंगाने उक्त प्रमाणे कक्ष हस्तांतरणाबाबतची जरूर ती प्रशासकीय कार्यवाही तातडीने पूर्ण करून घ्यावी.

०३. सदर शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६/आयु-२, दिनांक १०.०६.२०२० च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१५१२३८१७३९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2020.10.05 11:59:30 +05'30'

(वर्षा भरोसे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, वित्त व नियोजन, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, कृषी व फलोत्पादन, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
७. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, मंत्रालय, मुंबई
८. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य, मंत्रालय, मुंबई
९. मा. संसद सदस्य (सर्व)
१०.मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
११.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१२.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.प्रधान सचिव, कृषी व फलोत्पादन, कृषी व प.दू.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये, मंत्रालय, मुंबई
१८. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक,मुंबई,
२०.आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई
२१.संचालक, आयुष विभाग, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली
२२.संचालक,आरोग्यसेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई,
२३.संचालक, आयुष संचालनालय, मुंबई
२४.व्यवस्थापकीय संचालक, राज्य औषधी वनस्पती मंडळ, पुणे
२५.तांत्रिक अधिकारी व परवाना प्राधिकारी ASU आणि होमिओपॅथी औषध परवाना प्राधिकरण, FDA, मुंबई
२६.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर
२७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२९.कोषागार अधिकारी (सर्व जिल्हा)
३०.वरिष्ठ तांत्रिक अधिकारी (आयुर्वेद, होमिओपॅथी, युनानी, सिध्द, योग आणि प्राकृतिक चिकित्सा आणि औषधी वनस्पती), मुंबई
३१.सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३२.सह सचिव / उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३३.सह सचिव / उप सचिव, (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३४.सह सचिव / उप सचिव, (फलोत्पादन), कृषी व प.दू.म. विभाग, मंत्रालय, मुंबई
३५.सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व)

३६.संचालक (वित्त व लेखा),राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई,
३७.अतिरिक्त संचालक,राज्य कुटुंब कल्याण कार्यालय,पुणे,
३८. सर्व सहसंचालक (आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत)
३९.उपसंचालक, सर्व मंडळ कार्यालये,
४०.जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
४१.जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
४२.निवडनस्ती / आरोग्य-७